**महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबादच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या विरुध्द (मुख्य कार्यकारी अधिकारी वगळून ) भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम १९८८, अंतर्गत अभियोग दाखल करण्यासाठी मंजूरी देण्यास सक्षम प्राधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वक्फ २०१५/प्र.क्र.३४/का-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा चोक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०१५

**वाचा**

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक अभियो-१३१२/प्र.क्र.३०/पुर्नबांधित-१/११अ, दि.१२ फेब्रुवारी, २०१३.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबादच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या विरुध्द (मुख्य कार्यकारी अधिकारी वगळून ) भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यासाठी मंजुरी देण्यास सक्षम प्राधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

या सदंर्भात अस्तित्वात असलेले सर्व शासन निर्णय/आदेश अधिक्रमीत करुन, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या कार्यालयातील तसेच या कार्यालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या विरुध्द (मुख्य कार्यकारी अधिकारी वगळून ) भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यासाठी मंजूरी देण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांना सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

सद्य:स्थितीत महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद येथे वर नमूद केल्याप्रमाणे अभियोग दाखल परवानगी आवश्यक असणाऱ्या सर्व प्रकरण/प्रलंबित प्रकरणांच्या बाबतीत देखील अभियोग दाखल करण्यासाठी परवानगी देण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी हे सक्षम प्राधिकारी राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mdd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९१५४१४३७४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2015.02.09 16:33:45 +05'30'

**( अनिस शेख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव ( गृह ), मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
९. महसंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग
१०.प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा ), मुंबई
११.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा ), मुंबई
१२.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१३.पिठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद
१५.सर्व पोलिस अधिक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग
१६.खाजगी सचिव, मा.मंत्री (अल्पसंख्याक विकास )
१७.निवडनस्ती/ संग्रहार्थ/कार्यासन-४.